**भूसंपादन आस्थापना: विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या कार्यालयातील निवाडा शाखेतील ३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ पासून पुढे मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. एलक्यूएन-०२/२०१२/प्र.क्र.७५/अ-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १०.०४.२०२३

वाचा: १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एलक्यूएन ३१७१/क्यू, दिनांक ४.०८.१९७२
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-०२/२०१६/प्र.क्र.२०/अ-२, दि.२३.१०.२०१७
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एलक्यूएन ०२/२०१२/प्र.क्र.७५/अ-२, दि.०७.१०.२०२२
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३
५) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र जा.क्र.संसनर-निवाडा शाखा/ पदांना मुदतवाढ/ २०२२, दि. १७.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या दि.०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयाने दि.०१.०३.२०२३ दि.३१.०८.२०२३ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करणेबाबत मान्यता देण्यात आली आहे.

विभागीय आयुक्त, कोकण, यांनी त्यांचे दि.१७.०२.२०२३ च्या पत्रानुसार त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत विनंती केली आहे. यापूर्वी दि.०१.०९.२०२२ ते दि. २८.०२.२०२३ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर भूसंपादन कार्यालयामध्ये कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नसल्यामुळे वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून विभागीय आयुक्त, कोकण, यांचे अधिनस्त विभागातील भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एलक्यूएन ३१७१/क्यू, दि.४.०८.१९७२ अन्वये आयुक्त, कोकण विभाग यांचेकडे कोकण विभागातील विशेष भूसंपादन अधिका-यांकडून येणा-या भूसंपादन संबंधीत प्रारुप निवाडयाची छाननी करण्यासाठी नगर रचनाकार-२, रचना सहायक-२ व लघु टंकलेखक-१ अशी एकूण ५ अस्थायी पदे निर्माण करण्यात आलेली आहेत. तथापि, विभागीय आयुक्त, कोकण यांचे सं.क्र.५ च्या पत्रानुसार सहायक संचालक नगररचना-१ पद, सहायक नगररचनाकार-१ पद व लघुटंकलेखक-१ पद अशी एकूण ३ पदे सद्यस्थितीत कार्यरत आहेत.

२. संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयाद्वारे निवाडा शाखेतील नगररचनाकार संवर्गातील पद सहायक संचालक, नगररचना या पदात रुपांतरित करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णय, दि.०७.१०.२०२२ अन्वये दि.०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३

पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती. संदर्भाधीन क्र.४ मधील शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेता, विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या कार्यालयातील निवाडा शाखेतील खालील तक्यात नमूद ३ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

| कार्यालय | पदनाम | पदांची संख्या | सुधारित वेतन श्रेणी |
|---|---|---|---|
| विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण. | सहायक संचालक, नगररचना | १ | स्तर - २३ |
| | सहायक नगररचनाकार | १ | स्तर - १५ |
| | लघु टंकलेखक | १ | स्तर - ८ |

**अटी:-**

१) निरनिराळया विभागांनी अतिरिक्त म्हणून जाहीर केलेल्या २९,००० अतिरिक्त पदांपैकी (भूसंपादन कक्षातील पदासह) महसूल व वन विभागाने अतिरिक्त म्हणून जाहीर केलेली पदे रद्द करण्याबाबतचे आदेश काढलेले आहेत.

२) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदावरील अधिकारी / कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

३) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचा-यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम / स्थायी, अस्थायी पदासाठीच्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून करण्यात येत नाही.

४) प्रस्तावाधीन प्रकरणामध्ये मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाही अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू ठेवलेले नाही.

५) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

६) सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

३. सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी.

४. उपरोक्त पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या स्थायी आदेशाप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरकभत्ते मिळण्यास पात्र राहतील. या पदांना दिनांक ३१.०८.२०२३ नंतर मुदतवाढ देणे आवश्यक असल्यास मुदतवाढीचा प्रस्ताव विभागीय आयुक्त, कोकण यांनी समर्थनासह शासनाला सादर करावा.

५. या बाबत होणारा खर्च मागणी क्रमांक "सी-१-२०५३-जिल्हा प्रशासन-१०१-आयुक्त (०१) (०१) आयुक्त कोकण वेतने (२०५३-०३८-७०१)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे, शासन निर्णय क्रमांक. पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क.,दि.०८.०२.२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे, विभागीय आयुक्त, कोकण यांनी त्यांच्या आस्थापनेवरील व नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घ्यावा. पदांचा आढावा घेतांना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा. दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ या कालावधीमध्ये आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करणे आवश्यक आहे. सबब, त्याबाबतचे प्रस्ताव विहीत कालावधीत शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी. अन्यथा, मुदतवाढीअभावी सदर अस्थायी पदांना वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी आपल्या कार्यालयाची राहील याची नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०४१०२००३१५१८१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KEDARPRATAP JAYSING PATIL

Digitally signed by KEDARPRATAP JAYSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a304b555c16c6333932e94031b478a58b30bb35922ff7cfdc101bf31d56ff8d, pseudonym=B44BFB88097D80ECCD982D439D4A688BB06CD57C, serialNumber=3847160374ED91C72AF7F541ED5885A54E39968A0CDDD47C85355D5B730A40BF, cn=KEDARPRATAP JAYSING PATIL
Date: 2023.04.11 16:04:24 +05'30'

**( केदारप्रताप पाटील )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई. (३ प्रती )
२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
३. संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई. (३ प्रती)
५. वित्त विभाग, व्यय-९, अर्थसंकल्प-१९, वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-३२.
६. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अ-३ आणि अ-४, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (अ-२).